**आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान खरेदी करताना घ्यावयाची दक्षता.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः अखत १११५/VIP ३०/ प्र.क्र.६०( भाग-१) / नापु २९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई
तारीख: ३ सप्टेंबर २०१५

**संदर्भ-** विभागीय आयुक्त, नागपूर यांचे क्रमांक पुरवठा/ १७(१)/ कावि/१८५/२०१५, दि.०९.०७.२०१५ चे पत्र.

**प्रस्तावना -**

किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत भंडारा जिल्हयात हंगाम २०१३-१४ मध्ये धान खरेदी करताना झालेल्या अनियमिततांची तपासणी करण्यासाठी अप्पर जिल्हाधिकारी, अहेरी, जि. गडचिरोली यांच्या अध्यक्षतेखालील समितीने दिलेल्या अहवालाचा अभ्यास करुन कार्यवाहीच्या अनुषंगाने शिफारशी करण्यासाठी गृह विभागाने " विभागीय आयुक्त, नागपूर व विशेष पोलीस महानिरीक्षक, नागपूर परिक्षेत्र यांचा समावेश असलेली द्वीसदस्यीय समिती स्थापन केली होती. सदर विशेष तपास समितीने किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान खरेदी करण्याची योजना अधिक प्रभावीपणे राबविणे व त्यातील उणिवा दूर करणेसाठी शिफारशी शासनास सादर केल्या होत्या. सदर शिफारशींच्या अनुषंगाने उपाययोजनांची अंमलबजावणी करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यास अनुसरुन शासनाने आता पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे :-

**शासन परिपत्रक -**

किमान आधारभुत किंमत खरेदी योजनेंतर्गत धान खरेदी करण्याची योजना अधिक प्रभावीपणे राबविणे व त्यातील उणिवा दूर करणेसाठी तसेच धान खरेदी करताना अनियमितता होऊ नये म्हणून धान खरेदी करणा-या अभिकर्ता संस्था महाराष्ट्र स्टेट को. ऑप. मार्केटिंग फेडरेशन व आदिवासी विकास महामंडळ, नाशिक यांनी खाली नमूद केलेल्या बाबींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

१) किमान आधारभूत किंमत खरेदी योजनेंतर्गत ज्या शेतक-यांकडून धान खरेदी करण्यात येईल अशा लाभधारक शेतक-यांचे आधार कार्ड व बँक खाते लिंक करुन व त्यांची ऑनलाईन नोंदणी करुन त्यांचे खात्यावर धानाची रक्कम जमा करण्यात यावी.

२) धान खरेदी केंद्र ते गोदाम तसेच गोदाम ते भरडाई मिल्स या अंतरासाठी येणारा वाहतूकीच्या खर्चाचे दर केंद्र शासनाने निश्चित केल्याप्रमाणे प्रत्येक जिल्हयाच्या जिल्हा समन्वय समितीने तात्काळ निश्चित करावेत, जेणेकरुन भरडाई करताना येणा-या समस्यांचे निराकरण होईल.

३) धान उत्पादक शेतक-यांकडे असलेल्या जमिनीच्या प्रति हेक्टरी २० क्विंटल या प्रमाणातच धानाची खरेदी करण्यात यावी.

४) धान भरडाई करणा-या मिलर्सची ऑनलाईन नोंदणी करुन त्यांना संगणक आज्ञावलीमध्ये सामावून घ्यावे. या नोंदणीमध्ये त्या मिलविषयी सर्व भौतिक व आर्थिक माहिती नोंदविणे आवश्यक आहे. तसेच भरडाईसाठी नियुक्त केलेल्या मिलर्सना MPR (Monthly/ Weekly/progress Report ऑनलाईन सादर करणे आवश्यक राहील. त्यामुळे प्रक्रिया अधिक पारदर्शक व गतीमान होण्यास मदत होईल.

५) धान भरडाईसाठी देताना त्याचे भरडाई केंद्रावर क्षमतेनुसार साधारण १-२ महिने पुरेल एवढेच धान देण्यात यावे. त्या धानाची पूर्ण भरडाई होऊन त्याचा तांदूळ FCI कडे जमा केल्यानंतरच दुसरा लॉट देण्यात यावा. हा लॉट देतानाही पुर्वीप्रमाणे मागील महिन्याचे/ दोन महिन्यांचे पहिल्या बिलांनंतरची सर्व बीले जमा करण्यात यावीत . त्यावरुन त्या भरडाई केंद्रात त्याच कालावधीत तेवढया धानाची भरडाई झाली आहे याची खात्री करता येईल. यामुळे भरडाई प्रक्रियेवर प्रभावी नियंत्रण ठेवता येईल.

६) धान खरेदी केंद्रावर पहिली खरेदी- पहिली भरडाई- FIFO पध्दत वापरण्यात यावी. यामुळे जूने धान खराब होण्याची शक्यता कमी होईल तसेच शासनाचे नुकसान होणार नाही.

७) किंमत आधारभूत खरेदी योजनेंतर्गत धान खरेदी योजनेस रेडियो/ स्थानिक वर्तमानपत्रे/ टी.व्ही. इ. माध्यमातुन व्यापक प्रसिध्दी देण्यात यावी. त्यामध्ये खरेदी केंद्रे, खरेदीचा कालावधी व किमान आधारभूत किंमतीचा उल्लेख असावा. तसेच त्याबाबतची माहिती शेतक-यांना मिळावी यासाठी स्थानिक स्तरावर , ग्रामपंचायत/चावडी तहसील कार्यालय/ गट विकास अधिकारी/ तालुका कृषि अधिकारी इ. ना माहिती देण्यात यावी.

८) शेतक-याने धान विक्री केल्यानंर धान खरेदी नंतर तात्काळ संबंधित शेतक-यांचे बँक खात्यावर रक्कम जमा करण्यात यावी. कोणत्याही परिस्थितीमध्ये ८ दिवसांचे आत रक्कम अदा करणे अभिकर्ता संस्थांना बंधनकारक राहील याची अभिकर्ता संस्थांनी दक्षता घ्यावी.

९) धान खरेदीकरिता अभिकर्ता संस्थांनी स्वतंत्र यंत्रणा निर्माण करावी. तसेच पुरेसा प्रशिक्षीत कर्मचारी वर्ग ठेवावा.

१०) मिलर्स व धान तांदूळ व्यापा-यांना अभिकर्ता संस्थांकडून साठा मर्यादेचे बंधन घालण्यात यावे.

उपरोक्त उपाययोजनांची तात्काळ अंमलबजावणी करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१५०९०३१४४२४४६२०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SATISH SHRIDHAR SUPE

Digitally signed by SATISH SHRIDHAR SUPE
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SATISH SHRIDHAR SUPE
Date: 2015.09.03 14:59:24 +05'30'

( सतिश सुपे )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मर्या. ,मुंबई.
२) व्यवस्थापकीय संचालक, आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.

३) जिल्हाधिकारी, गोंदिया, गडचिरोली, नागपूर, भंडारा, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी,सिंधुदूर्ग, कोल्हापूर
४) महाव्यवस्थापक, भारतीय अन्न महामंडळ, मुंबई,
५) उपायुक्त ( पुरवठा), विभागीय आयुक्त कार्यालय, नागपुर/ कोकण
६) जिल्हा पुरवठा अधिकारी, गोंदिया, गडचिरोली, नागपूर, भंडारा, ठाणे, पालघर, रायगड, रत्नागिरी,सिंधुदूर्ग, कोल्हापूर
७) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक सरंक्षण विभाग
८) प्रादेशिक व्यवस्थापक , भारतीय अन्न महामंडळ, मुंबई,/पनवेल/ नागपुर
९) प्रत संग्रहार्थ ( नापु -२९)